

# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

१) श्री गणेश पंचरत्न स्तोत्र.

मुदा करात्तमोदकं
सदा विमुक्तिसाधकं !
कलाधरावतंसकं
विलासिलोकरञ्जकम् !!
अनायकैकनायकं विनाशितेभदैत्यकं !
नताशुभाशुनाशकं
नमामि तं विनायकम् !!१!!

भगवान श्री गणेशांच्या दिव्य वैभवाचे आनंदगायन करताना भगवान जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज शब्दकळा साकारतात,

मुदा करात्तमोदक- मुदा अर्थात आनंदाने. ज्यांनी आनंदाने हाती मोदक धारण केला आहे असे. आतून, आपला आपल्याला होणारा आनंद म्हणजे मोद. भगवान स्वत: त्या आनंदाने युक्त आहेत आणि भक्तांच्या जीवनात तो आनंद देण्यासाठी त्यांनी हातात मोदक घेतला आहे. मोद म्हणजे आनंद , तो निर्माण करतो तो मोद-क.

सदाविमुक्तिसाधक- हा आनंद प्राप्त होणे हेच मुक्तीचे स्वरूप. साधकांना सदैव मुक्ती प्रदान करणारा आहे माझा मोरया.

कलाधरावतंसक - कलाधर म्हणजे चंद्र. त्याच्या विविध कला असतात. ती चंद्रकला मस्तकावर धारण करून सौंदर्यपूर्ण असणारे ते कलाधरावतंसक.

विलासिलोकरञ्जक- स्वर्गाला विलास लोक असे म्हणतात. तेथे देवता तथा स्वर्गीय जीव विविध आनंदांचा चा उपयोग घेत विलास करीत असतात. त्या सगळ्यांना आनंद प्रदान करणारे मोरया विलासिलोकरञ्जक संबोधिले जातात.

अनायक-एकनायक- त्यांच्यावर कोणाचीही सत्ता चालत नाही म्हणून त्यांना म्हणतात अनायक. तसेच ते एकटेच सगळ्या विश्वाचे नायक असल्याने त्यांना म्हणतात एकनायक .

विनाशितेभदैत्यक- इभ म्हणजे हत्ती. हा सर्वाधिक बलशाली जीव. तसे जे भयंकर दैत्य ते इभदैत्य.

श्री मुदगल पुराणात आपल्याच आत असणाऱ्या काम, क्रोधादिक षट् विकारांना आणि ममत्व तथा अहंकार यांना राक्षस रूपात वर्णिले आहे. या सर्व महाभयानक राक्षसांचा विनाश करणारे श्री गणेश विनाशितेभदैत्यक असतात.

नताशुभाशुनाशक- नत अर्थात शरण आलेल्यांचे अशुभ अर्थात दु:ख, दैन्य, दारिद्र्य, पीडा, व्यथा इ. आशु म्हणजे तत्काल नष्ट करणारे भगवान गणेश भक्तांसाठी नताशुभाशुनाशक आहेत असे भगवान शंकराचार्य स्वामी महाराज म्हणत आहेत.

भगवान श्री गणेशांच्या याच स्वरूपाने आनंदित होऊन ते म्हणतात- नमामि तं विनायकम् !

भगवान गणेशांवर कोणाचीही नायकत्व चालत नाही त्यामुळे त्यांना वि-नायक म्हणतात. तसेच ते एकटेच सगळ्यांचे विशेष नायक असल्यानेही त्यांना वि-नायक म्हणतात.

अशा विनायक भगवान गणेशांना मी वंदन करतो.!! १!!



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

२) श्री गणेश पंचरत्न स्तोत्र.

नतेतरातिभीकरं नवोदितार्कभास्वरं !
नमत्सुरारिनिर्जरं
नताधिकापदुद्धरम् !!
सुरेश्वरं निधीश्वरं
गजेश्वरं गणेश्वरं !
महेश्वरं तमाश्रये
परात्परं निरंतरम् !!२!!

नतेतरातिभीकर-

नत अर्थात वंदन करणारे. नतेतर अर्थात वंदन न करणारे म्हणजे अभक्त,दुष्ट, राक्षसी वृत्तीचे. त्यांच्यासाठी भीकर अर्थात भयानक असणारे ते, नतेतरातिभीकर.

नवोदितार्कभास्वर- नवोदित अर्थात नुकत्याच उगवलेल्या,अर्क अर्थात सूर्याप्रमाणे, भास्वर अर्थात तेजस्वी असणारे. नुकत्याच उगवलेल्या सूर्याप्रमाणे लाल रंग असणारे, तसा प्रकाशाचा, ज्ञानाचा, तेजाचा वर्षाव करणारे. तरीही सूर्याप्रमाणे दाहक नसलेले, प्रसन्न मनमोहक असणारे.

नमत्सुरारिनिर्जरं - सुरारी अर्थात सुरांचे म्हणजे देवांचे शत्रू, दैत्य. तर निर्जर म्हणजे देव. त्यांना कधीच जरा म्हणजे म्हातारपण येत नसल्याने त्यांना निर्जर असे म्हणतात. हे दोन्ही ज्यांना वंदन करतात ते नमत्सुरारिनिर्जर.

नताधिकापदुद्धर- विनम्र असलेल्या आपल्या भक्तांच्या मोठ्यातल्या मोठ्या आपत्तींमधून अर्थात शास्त्रीय भाषेत या संसारदुःखातून उद्धार करणारे ते नताधिकापदुद्धर.

सुरेश्वर अर्थात सगळ्या देवांचे देव.

निधीश्वर अर्थात सर्व प्रकारच्या वैभवांचे स्वामी.

गजेश्वर अर्थात निर्गुण निराकार परब्रह्म. जे सगुण-साकार ते जग. त्याच्या विपरीत ते गज.ते निर्गुण निराकारत्व हेच मोरयाचे वैभव. त्यामुळे हे गजेश्वर

गणेश्वर अर्थात गणांचे ईश्वर. शास्त्रात व्यष्टी आणि समष्टी असे दोन स्तरांवर वर्णन असते.

व्यष्टी स्तरावर व्यक्तिगत स्वरुपात, शरीरातील विविध अवयवांच्या शक्तींना गण म्हणतात. तर समष्टी अर्थात वैश्विक पातळीवर सर्व देवी-देवतांना ईश्वर महेश्वरांना गण असे म्हणतात. या सगळ्यांवर भगवान गणेशांचा अधिकार चालत असल्याने त्यांना गणेश्वर असे म्हणतात.

महेश्वर अर्थात सगळ्यात मोठे ईश्वर. सर्वपूज्य, सर्वादिपूज्य परब्रह्म.

त्या परात्पर अर्थात श्रेष्ठाहून श्रेष्ठ भगवंताला मी निरंतर अर्थात सदैव शरण जातो. माझ्या सकल कल्याणार्थ त्यांच्या चरणांचा आश्रय घेतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

३) श्री गणेश पंचरत्न स्तोत्र.

समस्तलोकशङ्करं
निरस्तदैत्यकुञ्जरं !
दरेतरोदरं वरं वरेभवक्त्रमक्षरम् !!
कृपाकरं क्षमाकरं
मुदाकरं यशस्करं !
मनस्करं नमस्कृतां नमस्करोमि भास्वरम् !! ३!!

समस्तलोकशङ्कर- शम् म्हणजे कल्याण. ते कल्याण जे करतात ते शंकर. समस्त लोक अर्थात सर्व लोकांचे किंवा सर्व विश्वाचे कल्याण करतात म्हणून मोरयांना समस्तलोकशङ्कर असे म्हणतात.

निरस्तदैत्यकुञ्जर- कुंजर म्हणजे हत्ती. दैत्यकुंजर अर्थात हत्तीप्रमाणे अत्यंत बलशाली असणारे दैत्य.

भगवान श्रीगणेश आणि आपल्या विविध अवतारात देवांतक- नरांतक, सिंधू, सिंदुर, कमलासुर इ. अनेक राक्षसांचा निःपात केला. त्यामुळे त्यांना निरस्तदैत्यकुञ्जर असे म्हणतात.

दरेतरोदर- दर शब्दाचा अर्थ आहे घट्ट. मजबूत. परिदृढ. त्याचा इतर म्हणजे विपरीत अर्थात लवचिक, परिवर्तनीय ते दरेतर. असे ज्यांचे उदर अर्थात पोट ते दरेतरोदर.

भगवान श्री गणेशांना लंबोदर असे म्हणतात. त्यांच्या उदरातून ही अनंत कोटीब्रह्मांडे उत्पन्न होतात आणि शेवटी त्यातच लय पावतात. त्यामुळे त्यांना लंबोदर म्हणतात. भगवान गणेश असे लंबोदर असल्याने त्यांचे उदर सगळ्यांना सामावून घेणारे लवचिक आहे म्हणून ते दरेतरोदर.

वर म्हणजे सर्वश्रेष्ठ.

वरेभवक्त्रमक्षर- वर म्हणजे श्रेष्ठ. इभ म्हणजे गज अर्थात निर्गुण निराकार. असे निर्गुण-निराकार तत्व आहे ॐ कार ब्रह्म. त्याला अक्षर असे म्हणतात. तेच ज्यांचे वक्त्र अर्थात मुख ते वरेभवक्त्रमक्षर.

मुख ही आपली ओळख आहे. चेहऱ्यावरूनच आपण एकमेकांना ओळखतो. निर्गुण, निराकार ॐ कार हीच मोरया ची ओळख म्हणून मोरया,वरेभवक्त्रमक्षर.

कृपाकर अर्थात भक्तांच्या जीवनात कृपेचा अखंड वर्षाव करणारे.

क्षमाकर अर्थात प्रार्थना करणाऱ्या, क्षमा याचना करणाऱ्या भक्तांच्या चुकांना माफ करणारे.

मुदाकर अर्थात भक्तांच्या जीवनात सर्वोत्तम आनंद निर्माण करणारे.

यशस्कर- अर्थात उपासकांना त्यांच्या मन इच्छित कार्यात यश प्रदान करणारे.

नमस्कृतां मनस्कर- अर्थात धर्म संमत रीतीने वागणाऱ्यांच्या, श्री गणेश चरणावर नत असणाऱ्या सर्व भक्तांच्या मनात येणाऱ्या सर्व इच्छा पूर्ण करणारे.

अशा भास्वर अर्थात परम तेजस्वी भगवान गणेशांना मी नमस्कार करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

४) श्री गणेश पंचरत्न स्तोत्र.

अकिंचनार्तिमार्जनं चिरंतनोक्तिभाजनं !
पुरारिपूर्वनंदनं सुरारिगर्वचर्वणम् !!
प्रपञ्चनाशभीषणं धनंजयादिभूषणं !
कपोलदानवारणं भजे पुराणवारणम् !!४!!

अकिंचनार्तिमार्जन- किंचन म्हणजे थोडेसे, अल्प, किंचित. ते देखील त्यांच्याजवळ नाही ते अकिंचन. व्यवहारातील सुखाची, आनंदाची थोडीही साधने ज्यांच्याजवळ नाहीत ते अकिंचन. अध्यात्मिक भूमिकेतून ज्यांच्याजवळ साधना, उपासना नाही ते अकिंचन. त्यांनी देखील प्रार्थना केल्यावर त्यांची आर्तता म्हणजे दुःख दूर करतात ते अकिंचनार्तिमार्जन.

चिरंतनोक्तिभाजन- चिरंतन अर्थात शाश्वत, अक्षय, अविनाशी. उक्ती अर्थात वचन. जे शाश्वत वचन, चिरंतन कथन ते चिरंतनोक्ती.

अशी आहेत वेद,शास्त्र उपनिषदे. त्यात संगीतलेले ज्ञान शाश्वत आहे. त्यांचे कथन चिरंतन आहे.

अशा वेद,शास्त्रांचे भाजन अर्थात वर्ण्य विषय, सांगण्याचा मूळ सिद्धांत ते चिरंतनोक्तिभाजन.

पुरारिपूर्वनंदन- पुर म्हणजे नगर. ज्याच्याजवळ तीन पुर होते तो त्रिपुर. त्या त्रिपुरासुराचे शत्रू म्हणजे भगवान शंकर हे पुरारी.

त्यांचे पूर्वनंदन अर्थात मोठे चिरंजीव. श्रेष्ठ चिरंजीव. हा सामान्य अर्थ. तर भगवान शंकरांच्या देखील पूर्वी विद्यमान असणारे आनंदतत्व हा अधिक सुंदर अर्थ. हे आनंद तत्व, हा आत्माच पुत्र रुपात प्रगट होतो असे शास्त्र सांगते.

सुरारिगर्वचर्वण- सुर म्हणजे देवता. त्यांचे अरी म्हणजे शत्रू अर्थात दैत्य. त्या सगळ्या राक्षसांच्या गर्वाचा जे चावून चोथा करतात, अर्थात तो गर्व पूर्णपणे नष्ट करून टाकतात ते सुरारिगर्वचर्वण.

प्रपञ्चनाशभीषण- जे या भीषण प्रपंचाचा विनाश करतात किंवा जे या प्रपंचातील भीषणत्वाचा विनाश करतात त्यांना प्रपञ्चनाशभीषण असे म्हणतात.

धनंजयादिभूषण- आपल्या शरीरात प्राण, अपान इत्यादी मुख्य वायू सह नाग, कूर्म, कृकल, देवदत्त आणि धनंजय असे पाच उपप्राण असतात. यापैकी धनंजय हा मस्तकात रहात असून तो कधीही शरीर सोडत नाही. त्या धनंजयाला भूषण करणारे ते धनंजयादिभूषण. अर्थात यांच्या कृपेने या शरीरात चैतन्य तत्व शेवटपर्यंत स्थिर राहते ते धनंजयादिभूषण.

कपोलदानवारण- हा शब्द गजमस्तकाशी संबंधित आहे. हत्तीच्या सोंडेवर समोर जे अलंकृत कापड सोडतात त्याला कपोलदान असे म्हणतात. ते धारण केलेला वारण म्हणजे हत्ती. असा सजवलेला हत्ती हे सर्वोच्च समृद्धीचे प्रतीक आहे.भगवान गणेश अशा सर्वोच्च वैभवाने अलंकृत असल्याने त्यांचे नाव आहे कपोलदानवारण.

पुराणवारण- वारण शब्दाचा आणखी एक अर्थ आहे अदृश्य. पुराण वारण याचा अर्थ पुराणांमध्ये अदृष्य स्वरूपात असणारे. कोणत्याही ग्रंथात शब्द हे दृश्य असतात तर अर्थ अदृश्य असतात. सगळ्या पुराणांचा अंतिम अर्थ, अंतिम कथनीयतत्व, अंतिम सिद्धांत ते पुराणवारण.

अशा भगवान गणेशांचे मी भजन करतो, आराधना करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

५) श्री गणेशपञ्चरत्नस्तोत्रम् !

नितान्तकान्तदन्तकान्तिमन्तकान्तकात्मजं !
अचिन्त्यरूपमन्तहीनमन्तराय कृन्तनम् !!
हृदन्तरे निरंतरं वसंतमेव योगिनां !
तमेकदन्तमेव तं विचिन्तयामि संततम् !! ५!!

नितान्तकान्तदन्तकान्ती- भगवान श्री गणेशांचे मुख हे प्रतीक रूपात हत्ती समान आहे. हत्तीच्या मुखाचे आगळे सौंदर्य आहे त्याचे दात. सामान्य हत्तीचे ते दात मळलेले असतात. तुटलेले असतात. त्यामुळे त्याची कांती लोप पावलेली असते.

मात्र मोरयाचे वैभव आहे या दातांचे अत्यंत सौंदर्यपूर्णत्व. या दातांची कांती अर्थात तेज अतीव आकर्षक आहे.

हे दात एकतर हत्तींच्या आपापसातील भांडणामुळे खराब होतात किंवा त्याला कामाला जुंपल्यामुळे खराब होतात. भगवान श्री गणेशाच्या बाबतीत या दोन्ही गोष्टी शक्य नाहीत.ते एकमेवाद्वितीय असल्याने कोणाशी भांडणाचा प्रश्न नाही. तसेच त्यांना कोणी कामाला जुंपण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. पर्यायाने त्यांच्या दाताची कांती खराब होतच नाही.

त्यामुळे त्यांना 'नितान्त-कान्त-दन्तकान्ती 'असे म्हणतात.

अन्तकान्तकात्मज- अंत म्हणजे शेवट. जो शेवट करतो तो अंतक. अर्थात श्री यमराज. त्या यमाचा देखील जे अंत करतात ते अन्तकान्तक. अर्थात भगवान शंकर. त्या शंकरांच्या घरी भगवान श्री गणेश, मयुरेश्वर, गजानन, पुष्टीपती इ. विविध अवतारांच्या वेळी पुत्र रूपात अवतीर्ण होतात. त्यामुळे त्यांना अन्तकान्तकात्मज असे संबोधले जाते.

अचिंत्यरूप- भगवान गणेशांचे रूप आपल्यापेक्षा पूर्णतः भिन्न आहे. आपले मुख सगुण-साकार म्हणजे जग स्वरूप आहे. तर मोरयाचे मुख निर्गुण-निराकार अर्थात गज स्वरूप आहे. त्यामुळे आपल्या सामान्य चिंतनाच्या पलीकडे असणारे भगवान गणेश अचिंत्यरूप आहेत.

अंतहीन- भगवान गणेश जसे अनादी आहेत तसेच ते अनंत देखील आहेत. त्यांचा अंत संभव नाही.

अन्तरायकृन्तन- अंतराय म्हणजे अडचणी, संकटे,अडथळे. कृंतन अर्थात कुरतडून टाकणे. एखादी गोष्ट कुरतडून टाकली की ती पुन्हा जोडता येतच नाही. तसेच ज्यांच्या कृपेने भक्तांच्या जीवनातून दूर झालेले संकट कधीच परत येत नाही ते अन्तरायकृन्तन.

हृदन्तरे निरंतरं वसंतमेव योगिनाम् - अर्थात जे सदैव योग्यांच्या हृदयात निवास करतात. अर्थात योगी हृदयात सदैव ज्यांचे ध्यान करतात असे.

एकदंत- ज्यांची एकट्याचीच सत्ता संपूर्ण जगावर चालते त्यांना एकदंत असे म्हणतात.

जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज म्हणतात की मी त्या एकदंतांचे सदैव चिंतन करीत असतो. त्यांच्या त्या दिव्यशक्तित्वाचे चिंतन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

६) श्री गणेश पंचरत्न स्तोत्र.

महागणेशपञ्चरत्नमादरेण योऽन्वहम् !
प्रगायति प्रभातके हृदि स्मरन् गणेश्वरम् !!
अरोगतामदोषतां सुसाहितीं सुपुत्रतां !
समाहितायुरष्टभूतिमभ्युपैति सोऽचिरात् !!६!!

भगवान श्री गणेश यांचे वैभव सांगणाऱ्या या श्री गणेशपंचरत्न स्तोत्राच्या शेवटी भगवान जगद्गुरु श्री आदि शंकराचार्य महाराज हा फलश्रुती स्वरूप श्लोक रचित आहेत.

यात आरंभीच्या दोन ओळीमध्ये हे स्तोत्र कसे म्हणावे? याचे वर्णन आहे. तर पुढच्या दोन ओळींमध्ये या स्तोत्राने काय मिळते? ते वर्णिले आहे.

कसे म्हणावे हे स्तोत्र? पूज्यपाद आचार्य म्हणतात -

अन्वहम् - अर्थात याचे चिंतन रोज असले पाहिजे. कधीतरी, वेळ मिळेल तेव्हा, असे नाही.

प्रगायति- स्तोत्राचे गायन हवे. गायन हे आनंदातच शक्य असते. अर्थात स्तोत्र पाठ हा प्रसन्नपणे, आनंदात करण्याची गोष्ट आहे. काही मागण्यासाठी नाहीतर न मागता जे मिळाले त्याच्या धन्यवादासाठी स्तोत्रगायन हवे.

प्रभातके- सकाळच्या मंगलमय वेळी मंगलमूर्तीचे स्मरण असावे असे आचार्य विशेषत्वाने वर्णन करीत आहेत.

हृदिस्मरन् गणेश्वरम् -हे गायन हृदयात भगवान गणेशांचे चिंतन करीत केले जावे. मनात भलतेच विचार करीत केवळ तोंडाने स्तोत्र म्हणणे निरर्थक आहे हा त्यातील भाव.

या स्तोत्राच्या पठणाने काय प्राप्त होईल? याची सूची देताना आचार्य म्हणतात-

अरोगता-अर्थात साधकाला आरोग्यप्राप्ती होते. आरोग्य हेच सर्व सुखाचे अधिष्ठान आहे. ते नसेल तर अन्य सर्व साधने निरर्थक आहेत.

अदोषता- शरीर निरोगी होते तर मन निर्दोष होते.

सुसाहिती- अर्थातच सर्व सुयोग्य साधनांची प्राप्ती होते.

सुपुत्रता- चांगली संतती हा सगळ्यात सुंदर आनंद आहे. श्रीगणेश कृपेने पुत्र पौत्र प्राप्त होतात. अर्थात सर्व वैभव वंशपरंपरेने चालत राहते.

अष्टभूती- यश, सत्ता, संपत्ती, शांती, समाधान, आरोग्य आणि ज्ञान या आठ गोष्टींना अष्टभूती म्हणजे आठ प्रकारचे वैभव असे म्हणतात.

भगवान श्री गणेशांच्या कृपेने या सर्व गोष्टी प्राप्त होतात.

सोऽचिरात् - अर्थात अल्पावधीत. वर्षानुवर्ष किंवा जन्मोजन्म हे करत राहण्याची आवश्यकता नाही.

भगवान श्री गणेशाच्या कृपेने या सर्व गोष्टी लवकरात लवकर मिळतात ही जगद्गुरु आदि शंकराचार्यांची उक्ती म्हणजे सुनिश्चितेची ग्वाही आहे.

जय गजानन.